**पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांचेमार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या मोडी लिपी प्रशिक्षण वर्गास कायम स्वरुपी मंजूरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मपुवि २०१४/प्र.क्र.२००/सां.का.२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ मे ,२०१५.

वाचा: १. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक : मपुवि-२००७/प्र.क्र.४३/सां.का.२, दि.१४.५.२००८.
२.संचालक, पुराभिलेख संचालनलाय पत्र क्र.टीआरएन-५०१४/४३९९, दि.१५.१२.२०१४.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यातील शासकीय कार्यालयात मोठ्या स्वरुपात मोडीलिपीतील अभिलेख आहेत. सदर अभिलेख प्रशासकीयदृष्ट्या महत्वाचे असल्याने ते वाचण्यासाठी वाचक निर्माण करण्याच्या दृष्टीकोनातून तसेच भारतीय ऐतिहासिक कागदपत्र आयोग, नवी दिल्ली यांच्या ४६ व्या अधिवेशनातील ठराव क्रमांक ७ नुसार पुराभिलेख संचालनालयामार्फत मोडी लिपी प्रशिक्षण वर्ग योजना कायमस्वरुपी राबविण्यास या विभागाच्या संदर्भ १ येथील दि.१४ मे २००८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली. सदर शासन निर्णयान्वये प्रत्येक आर्थिक वर्षात जास्तीत जास्त ४ प्रशिक्षण शिबीरे आयोजित करण्याचा तसेच या प्रत्येक मोडी लिपी प्रशिक्षण शिबीरासाठी रु.३०,०००/- पर्यंत खर्च करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार सन २००८ पासून पुराभिलेख संचालनालयामार्फत मोडी लिपी प्रशिक्षण वर्ग शासनाच्या मान्यतेने आयोजित करण्यात येतात. तथापि, मागील काही वर्षांपासून राज्यातील विविध भागातील इतिहास प्रेमी, अभ्यासक, संशोधक, विद्यार्थी, शाळा, महाविद्यालय यांचेकडून मोडी लिपी शिकण्याकरीता पुराभिलेख संचालनालयाकडे मोडी लिपी प्रशिक्षण वर्ग आयोजित करण्याची वारंवार होत असलेली मागणी विचारात घेता, मोडी लिपी प्रशिक्षण वर्ग आयोजनामध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विचाराअंती शासन या शासन निर्णयान्वये मोडी लिपी प्रशिक्षण वर्ग योजनेमध्ये सुधारणा करुन पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांचेमार्फत खालील अटींच्या अधीन राहून सदर योजना कायम स्वरुपी राबविण्यास मान्यता देत आहे :-

१. एका आर्थिक वर्षात प्रत्येक महसूली विभागात एक याप्रमाणे एकूण ६ मोडीलिपी प्रशिक्षण वर्ग आयोजित करण्यात यावेत.
२. प्रत्येक मोडी लिपी प्रशिक्षण वर्गाचा खर्च कमाल रु.३०,०००/- इतक्या रकमेच्या मर्यादेत असावा.
३. यासाठी प्रत्येक प्रशिक्षणार्थींकडून रु.२५०/- प्रमाणे शुल्क आकारावे व शुल्काची रक्कम संबंधित जमा शिर्षाखाली जमा करावी व त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

२. याबाबतचा खर्च “मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला आणि संस्कृती (००) १०४, पुराभिलेख (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (२२०५ १७९५) १३ कार्यालयीन खर्च” या लेखाशिर्षाखाली त्या त्या वित्तीय वर्षात उपलब्ध करण्यात आलेल्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तीका, १९७८ भाग-पहिला, उप विभाग-तीन मधील अ.क्र.४ परिच्छेद क्र. २७ (२) मधील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१८१०५६१२८४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pradeep Ramchandra More

Digitally signed by Pradeep Ramchandra More
DN: CN = Pradeep Ramchandra More, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TOURISM AND CULTURAL AFFAIRS
Date: 2015.05.18 10:57:53 +05'30'

**(प्रदिप रा.मोरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
२) महालेखापाल,महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अवर सचिव (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई.
७) निवड नस्ती, सां.का.२.